वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या विद्यापीठास सन २०२४-२५ या <u>आर्थिक वर्षात निधी वितरीत करण्याबाबत</u> (कार्यक्रम खर्च)...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मकृवि-१२२४/प्र.क्र.२१५/७-अे,**
**मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७/०२/२०२५.

**वाचा**:-१)वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.
२) नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी यांचे पत्र जा. क्र. सीएफबी/२२६३/२०२४, दि.०३.१२.२०२४.

<u>प्रस्तावना</u>:-

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकान्वये सन २०२४-२५ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर,२०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत करण्याच्या सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये चालू आर्थिक वर्षात वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठास (२४१५ ०१०५) या लेखाशिर्षातंर्गत ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या उद्दिष्टाकरीता निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला होता. त्यासअनुसरुन वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१,पीकसंवर्धन (२४१५ ०१०५) (कार्यक्रम) या लेखाशिर्षातंर्गत ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ०१०५) या लेखाशीर्षांतर्गत ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता मूळ अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु.१०००.०० लाख (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उद्दीष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद (सन २०२४-२५) | वितरीत निधी | कामाचे नाव/योजना/ योजनेंतर्गत येणारे महाविद्यालयाचे बांधकाम | प्रशासकीय मान्यता आदेश व दिनांक | प्रशासकीय मान्यता किंमत (अनावर्ती) | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम), २४१५ ०१०५, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | ६३००.०० | २५२०.०० (पुर्नवितरण) | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मौजे जिरेवाडी,ता.परळी वैजनाथ, जि.बीड येथील कृषि व कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालयाच्या इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.. | शा.नि.क्र.मकृवि-१३२३/ प्र.क्र.२५३/ ७-अे दि.२८.१२.२०२३ | १३३०६.६९ | २००.०० |
| २ | | | | शासकीय कृषि महाविद्यालय, नांदेड. | शा.नि.क्र.मकृवि-१३२३/प्र.क्र.२५४ / ७अे, दि.२०.१२.२०२३ | ७८६५.२६ | २०५.०० |
| ३ | | | | कापूस संशोधन केंद्र, नांदेड येथील नवीन इमारतीचे बांधकाम. | शा.नि.क्र.मकृवि-१२२४/प्र.क्र.७४/७ अे, दि.१५.०३.२०२४ | ५००.०० | १००.०० |
| ४ | | | | परभणी मुख्यालयातील "पद्मश्री शामराव कदम विश्रामगृह" इमारत दुरुस्ती व नुतनीकरण. | शा.नि.क्र.मकृवि-१२२४/प्र.क्र.१५७ /७ अे, दि.२२.०८.२०२४ | २५०.०० | १००.०० |
| ५ | | | | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत परभणी मुख्यालयी व मुख्यालय बाहेरील विविध महाविद्यालय अंतर्गत मुला-मुलींच्या वसतिगृहामध्ये सोलार वॉटर हिटर बसविणे. | शा.नि.क्र.मकृवि१२२४/प्र.क्र.६७ /७ अे, दि.१४.०३.२०२४ | १९५.२६ | १९५.०० |
| ६ | | | | कृषि तंत्र विद्यालय, अंबेजोगाई, जि.बीड येथील विद्यार्थी वसतिगृह इमारतीचे बांधकाम.. | शा.नि.क्र.मकृवि१२२४/प्र.क्र.७३ /७ अे, दि.१५.०३.२०२४ | १४८७.४५ | १००.०० |
| ७ | | | | कृषि तंत्र विद्यालय, अंबेजोगाई, जि.बीड येथील विद्यार्थीनी वसतिगृह इमारतीचे बांधकाम. | शा.नि.क्र.मकृवि१२२४/प्र.क्र.७३ /७ अे, दि.१५.०३.२०२४ | १४८७.४५ | १००.०० |
| | | **६३००.००** | **२५२०.००** | | | **२५०९२.११** | **१०००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) प्रत्येक उपलेखाशीर्ष /गट /योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे /हिशोब ठेवावेत.

५) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे, हे तात्काळ शासनास कळवावे.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखासंहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

७) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

८) विद्यापीठास वितरीत केलेला निधी बँक खात्यामध्ये अखर्चित स्वरुपात पडून राहणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

कृषि विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**३.** याप्रीत्यर्थ होणारा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या कार्यक्रम लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**४.** सहायक लेखाधिकारी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

**५.** सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६/ का.१४३१, दि.१४/०१/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९/२०२५/व्यय-१/ दि.२१/०१/२०२५ नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२७१३२४०२१९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.02.27 13:25:43 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
६. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
७. सहायक लेखाधिकारी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,परभणी/ उपकोषागार अधिकारी,परभणी.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४.उप सचिव, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५.उप सचिव, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.